अल्पसंख्यांक समाजातील मुलींसाठी वसतिगृह, पनवेल,जिल्हा रायगड - प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय,पनवेल यांच्याकडे व्यवस्थापन सोपविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वसगृ-२०१२/प्रक्र.१६९/का.०८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २६ सप्टेंबर, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक मौआम-२००९/प्रक्र.१५/ का.८, दि.२.०३.२०१०
२) शासन निर्णय अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक अविवि-२००९/ प्रक्र.१५(४)/ का.८, दि.२४.०३.११
३) शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक अविवि-२००९/प्रक्र.१५/ का.८, दि.२५.०३.२०११
४) शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक वसगृ-२०१२/प्रक्र.११८/ का.८, दि.५.०३.२०१३
५) शासन निर्णय अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक वसगृ-२०१२/प्रक्र.१६८/का.८, दि.२१.०६.२०१३
६) शासन निर्णय अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक वसगृ-२०१२/प्रक्र.१६८/का.८, दि.५.०९.२०१४

**प्रस्तावना :-**

राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये अल्पसंख्यांक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींसाठीवसतिगृहे बांधण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार दिनांक १४ मार्च, २०१३ च्या शासन निर्णयाव्दारे शासकीय अध्यापक महाविद्यालय,पनवेल जिल्हा रायगड येथील आवारात वसतिगृह बांधण्यासाठी प्रशासकीय मान्यता घेण्यात आलेली आहे. सदर वसतिगृहाचे बांधकाम पूर्ण झाल्यामुळे ते प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल जिल्हा रायगड यांच्याकडे सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

## शासन निर्णय :-

अल्पसंख्याक विकास विभागामार्फत शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल जिल्हा रायगड येथे बांधण्यात आलेले वसतिगृहाचे व्यवस्थापन प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल

जिल्हा रायगड यांच्याकडे सोपविण्यात येत आहे. त्यांनी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग मार्ग विकास विभाग, क्रमांक ३ भिंगारी पनवेल यांच्याकडून इमारतीचा ताबा घेण्याबाबत रितसर कार्यवाही करावी

दिनांक २१ जून, २०१३ च्या शासन निर्णयाव्दारे या योजनेंतर्गत बांधण्यात आलेल्या वसतिगृहांच्या व्यवस्थापनाबाबतच्या सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल जिल्हा रायगड यांनी या वसतिगृहाची व्यवस्थापन करण्याची कार्यवाही करावी. तसेच, दिनांक ५ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयाव्दारे यासाठी आकारण्यात येणा-या शुल्काच्या दरात सुधारणा करण्यात आली आहे. त्या दरानुसार वसतिगृहात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थीनींकडून शुल्क आकारणी करण्यात यावी.

प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल जिल्हा रायगड यांनी रायगड व मुंबई जिल्हयातील तसेच नजीकच्या परिसरातील सर्व तंत्रनिकेतने, महाविद्यालये/ उच्च शिक्षण देणाऱ्या संस्था यांना या वसतिगृहाच्या उपलब्धतेबाबत अवगत करावे. दिनांक २.३.२०१० च्या शासन निर्णयाव्दारे विहित करण्यात आलेल्या आरक्षणाचे पालन करुन तेथील प्रवेशाची कार्यपध्दती पार पाडण्यात यावी. या संदर्भात आवश्यक तेथे अल्पसंख्याक विकास विभागाची पूर्व मंजूरी घेण्यात यावी. तसेच, त्यात देण्यात येणाऱ्या प्रवेशाबाबत शासनास वेळोवेळी अवगत करावे.

सदर शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५/१४ /मशि २, दिनांक १६ सप्टेंबर, २०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२६१११३२७६८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul Chand Attar

Digitally signed by Ainul Chand Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul Chand Attar
Date: 2014.09.26 13:56:25 +05'30'

**( अैनुल अत्तार )**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ) मुंबई
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. जिल्हाधिकारी, रायगड
६. अधिक्षक अभियंता, रायगड सार्वजनिक बांधकाम मंडळ,नवी मुंबई
७. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग मार्ग विकास विभाग, क्रमांक ३ भिंगारी पनवेल
८. प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल जिल्हा रायगड
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पांचवा मजला, मुंबई
११. अवर सचिव (रोख शाखा) अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रमुख लिपिक, जिल्हाधिकारी कार्यालय, अलिबाग, जिल्हा रायगड
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, अलिबाग, जिल्हा रायगड
१४. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४, व्यय -४) मंत्रालय, मुंबई
१५. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१६. रोख शाखा व का.७ अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती, का.८